**केंद्र पुरस्कृत प्रधानमंत्री जन विकास कार्यक्रमातंर्गत (PMJVK) अल्पसंख्याक बहूल क्षेत्रात स्मार्टक्लास प्रकल्पाच्या अंमलबजावणीसाठी केंद्र+राज्य हिश्यांतर्गत निधी वितरीत करण्याबाबत.**

**महाराष्ट्र शासन**

**अल्पसंख्याक विकास विभाग**

**शासन निर्णय क्रमांकः अविवि-२०२० /प्र.क्र.०३/का.०७**

मादाम कामा रोड, हुतात्मा राजगुरू चौक,

मंत्रालय,मुंबई - ४०० ०३२

दिनांक: - २८/१०/२०२१

**संदर्भ:-**

१. अल्पसंख्याक कार्य मंत्रालय, भारत सरकार, नवी दिल्ली यांच्या ३१ व्या Empowered Committee च्या बैठकीचे इतिवृत्त दि.१९/०२/२०२१

२. अवर सचिव, अल्पसंख्याक कार्य मंत्रालय, भारत सरकार, नवी दिल्ली यांचे पत्र क्र. १३/६६/२०२१-MsDP-MOMA, दि.२६/०३/२०२१.

३. सह सचिव, शालेय शिक्षण विभाग यांच्या अध्यक्षतेखालील संनियंत्रण समितीच्या दि.०४/०८/२०२१ रोजी आयोजीत केलेल्या बैठकीचे इतिवृत्त.

**प्रस्तावना :-**

केंद्र शासनाच्या अल्पसंख्याक कार्य मंत्रालयाच्या प्रधानमंत्री जन विकास कार्यक्रमांतर्गत (PMJVK) गठित शक्तिप्रदान समितीने दि.१९/०२/२०२१ रोजी झालेल्या ३१ व्या बैठकीत राज्यातील मान्यताप्राप्त गटातील अल्पसंख्याक बहुल क्षेत्रातील शाळांमध्ये स्मार्टक्लास प्रकल्प राबविण्यासाठी एकूण रु.३७,५९,२०,०००/- (सदतीस कोटी एकोणसाठ लाख वीस हजार फक्त) लाख इतक्या रकमेच्या प्रस्तावास मान्यता दिली आहे. केंद्र शासनाने संदर्भ क्र. (२) येथील आदेशाद्वारे प्रधानमंत्री जन विकास कार्यक्रमांतर्गत (PMJVK) स्मार्टक्लास प्रकल्पाच्या अंमलबजावणीसाठी मंजूर केंद्र हिश्श्यातील पहिल्या टप्प्यातील एकूण रु.६,७६,६५,६००/-( सहा कोटी शहात्तर लाख पासष्ट हजार सहाशे फक्त ) इतकी रक्कम वितरित केली आहे. सदर मंजूर प्रकल्प शालेय शिक्षण व क्रिडा विभागाने नियुक्त केलेल्या सनियंत्रण समितीच्या मार्गदर्शनाखाली राज्यातील अल्पसंख्याक बहुल क्षेत्रातील शाळांमध्ये राबविण्यात येणार आहे. सदर प्रकल्पासाठी निधी वितरणाकरीता केंद्र + राज्य हिश्श्याचे प्रमाण ६०: ४० असे आहे.

२. प्रधानमंत्री जन विकास कार्यक्रमांतर्गत (PMJVK) अल्पसंख्याक बहुल क्षेत्रातील निवड करण्यात आलेल्या ७४० शाळांमध्ये स्मार्टक्लास प्रकल्पाची अंमलबजावणी करण्यासाठी संचालक, टेलिकम्युनिकेशन कन्सल्टंट इंडिया लिमिटेड (TCIL) यांना दि.२३/०८/२०२१ रोजी कार्यारंभ आदेश (Work Order) निर्गमित करण्यात आले आहेत. सदर कार्यारंभ आदेशात (Work Order) नमूद केल्याप्रमाणे अंमलबजावणीकरीता Mobilization advance

against equivalent amount of Bank guarantee वर केंद्र व राज्य हिश्श्यातील एकूण प्रकल्प किंमतीच्या १० % प्रमाणे निधी वितरीत करावयाचा आहे.

३. त्यानुषंगाने केंद्र शासनाने संदर्भ क्र. (२) येथील आदेशाद्वारे प्रधानमंत्री जन विकास कार्यक्रमांतर्गत (PMJVK) अंतर्गत मान्यताप्राप्त अल्पसंख्याक बहुल क्षेत्रातील शाळांमध्ये स्मार्ट क्लास प्रकल्प राबविण्यासाठी केंद्र हिश्यातील पहिल्या टप्प्यातील एकूण रु.६,७६,६५,६००/- (अक्षरी रू.सहा कोटी शहात्तर लाख पासष्ट हजार सहाशे फक्त ) इतका निधी मंजूर करून वितरित केला आहे. या विभागाच्या दि.२३/०८/२०२१ रोजी निर्गमित करण्यात आलेल्या कार्यारंभ आदेशानुसार (Work Order) मे.टी.सी.आय.एल. कंपनीला प्रकल्पाच्या सुरुवातीला प्रकल्पाची अंमलबजावणीकरीता एकूण प्रकल्प किंमतीच्या केंद्र व राज्य हिश्श्यातील प्रती १०% रक्कम म्हणजेच रू.२,२५,५५,२००/-( अक्षरी रू.दोन कोटी पंचवीस लाख पंचावन्न हजार दोनशे फक्त) तसेच त्याससमरुप राज्य हिश्यातील रु.१,५०,३६,८००/- (अक्षरी रू.एक कोटी पंन्नास लाख छत्तीस हजार आठशे फक्त ) असा केंद्र व राज्य हिश्श्यातील एकूण रू.३,७५,९२,०००/- (अक्षरी रू.तीन कोटी पंच्याहत्तर लाख ब्याण्णव हजार फक्त) लाख इतका निधी मे. टेलिकम्युनिकेशन कन्सल्टंट इंडिया लिमिटेड (TCIL) या भारत सरकारच्या सार्वजनिक उपक्रम कंपनीस मंजूर करुन वितरित करण्याची बाब शासनाच्या विचाराधिन होती.

**शासन निर्णयः-**

केंद्र शासनाच्या अल्पसंख्याक कार्य मंत्रालयाकडून संदर्भ क्र. (२) येथील पत्रान्वये प्रधानमंत्री जन विकास कार्यक्रमांतर्गत (PMJVK) केंद्र हिश्श्यातील रु.६,७६,६५,६००/- (अक्षरी रू.सहा कोटी शहात्तर लाख पासष्ट हजार सहाशे फक्त) इतका निधी मंजूर केला आहे. या विभागाच्या दि.२३/०८/२०२१ रोजी निर्गमित करण्यात आलेल्या कार्यारंभ आदेशानुसार (Work Order) मे.टी.सी.आय.एल. कंपनीला अल्पसंख्याक बहूल क्षेत्रात स्मार्टक्लास प्रकल्पाच्या अंमलबजावणीकरीता केंद्र व राज्य हिश्श्यातील एकूण प्रकल्प किंमतीच्या प्रती १०% रक्कम म्हणजेच केंद्र हिश्श्यातील रू.२,२५,५५,२००/-(अक्षरी रू.दोन कोटी पंचवीस लाख पंचावन्न हजार दोनशे फक्त) तसेच त्याससमरुप वितरीत करावयाचा राज्य हिश्श्यातील रु.१,५०,३६,८००/- (अक्षरी रू.एक कोटी पंन्नास लाख छत्तीस हजार आठशे फक्त) असा केंद्र व राज्य हिश्श्यातील एकूण रू.३,७५,९२,०००/- (अक्षरी रू.तीन कोटी पंच्याहत्तर लाख ब्याण्णव हजार फक्त) इतका निधी मे. टेलिकम्युनिकेशन कन्सल्टंट इंडिया लिमिटेड (TCIL) या भारत सरकारच्या सार्वजनिक उपक्रम कंपनीस खालीलप्रमाणे मंजूर करुन वितरित करण्यास या शासन निर्णयाद्वारे मान्यता देण्यात येत आहे.

(रुपये लाखात)

| अ.क्र. | प्रकल्पाचे नाव | युनिटची संख्या | हिश्श्याचे प्रमाण | केंद्र शासनाच्या मान्यतेनुसार प्रती युनीट खर्च | एकूण केंद्र हिस्सा | एकूण राज्य हिस्सा | एकूण | वितरीत करावयाचा केंद्र हिस्सा (१० % प्रमाणे) | वितरीत करावयाचा राज्य हिस्सा (१० % प्रमाणे) |
|---|---|---|---|---|---|---|---|---|---|
| १ | २ | ३ | ४ | ५ | ६ | ७ | ८ | ९ | १० |
| १ | स्मार्टक्लास प्रकल्प (TCIL) | १४८० | ६० : ४० | २.५४ | २२५५.५२ | १५०३.६८ | ३७५९.२० | २२५.५५२ | १५०.३६८ |
| | **एकूण** | **१४८०** | **६० : ४०** | **२.५४** | **२२५५.५२** | **१५०३.६८** | **३७५९.२०** | **२२५.५५२** | **१५०.३६८** |

२. उपरोक्त तक्त्यातील स्तंभ क्र.(९) व क्र.(१०) प्रमाणे सन २०२१-२२ या वर्षात मे. टेलिकम्युनिकेशन कन्सल्टंट इंडिया लिमिटेड (TCIL) यांना उपरोक्त प्रमाणे मंजूर करण्यात आलेल्या एकूण रकमेच्या मर्यादेत अर्थसंकल्प वितरण प्रणालीतून सदर रक्कम आहरित व संवितरित करण्यास या शासन निर्णयाद्वारे मंजूरी देण्यात येत आहे. अवर सचिव, अल्पसंख्याक विकास विभाग यांनी प्रधानमंत्री जन विकास कार्यक्रमांतर्गत राज्यातील मान्यताप्राप्त गटातील अल्पसंख्याक बहुल क्षेत्रातील शाळांमध्ये स्मार्टक्लास प्रकल्प राबविण्यासाठी आहरित केलेली रक्कम संबंधित अंमलबजावणी यंत्रणेस म्हणजेच मे. टेलिकम्युनिकेशन कन्सल्टंट इंडिया लिमिटेड (TCIL) यांना रितसर वितरीत करावी. वितरित रक्कम कोणत्याही परिस्थितीत परस्पर अन्य कामांसाठी वळवून खर्च करता येणार नाही. उपरोक्त विकासकामांना दुबार निधीचे वितरण होत नसल्याची खातरजमा करुन घेण्यात यावी.

३. सदरचा खर्च करण्यास वित्तीय अधिकारांच्या मर्यादेत C.V.C च्या मार्गदर्शक तत्वानुसार / CAG च्या निर्देशानुसार कोणताही शासन निर्णय / अटी व शर्तीचा भंग होणार नाही, याची दक्षता संबंधितांनी घ्यावी. सदर रक्कम वितरित करण्यापूर्वी संबंधित अंमलबजावणी अधिकारी यानी शासनाने यासंदर्भात वेळोवेळी निर्गमित केलेल्या शासन निर्णय / कार्यालयीन आदेश / वित्तीय नियमावली / सार्वजनिक बांधकाम विभागाची कार्यनियमावली / भारताचे नियंत्रक व महालेखापरीक्षक यांचे निरिक्षण अहवाल / वित्तीय कार्यपध्दती यांचा अवलंब करावा. तसेच सदर रक्कम चालू आर्थिक वर्षात उपयोगात आणणे आवश्यक राहील. सदर निधी कोणत्याही संस्थेत ठेव स्वरुपात जमा करता येणार नाही.

४. मे. टेलिकम्युनिकेशन कन्सल्टंट इंडिया लिमिटेड (TCIL) यांनी प्रधानमंत्री जन विकास कार्यक्रमांतर्गत राज्यातील मान्यताप्राप्त गटातील अल्पसंख्याक बहुल क्षेत्रातील शाळांमध्ये स्मार्टक्लास प्रकल्प राबविण्यासाठी

केंद्र व राज्य शासनाकडून प्राप्त झालेल्या निधीच्या विनियोगाबाबतची उपयोगिता प्रमाणपत्रे तसेच त्रैमासिक अहवाल (QPR) विहित नमुन्यात (अद्ययावत छायाचित्रांसह) शालेय शिक्षण व क्रिडा विभागास सादर करावीत.

५. सह सचिव, (विद्यार्थी विकास) शालेय शिक्षण व क्रिडा विभाग यांनी प्रधानमंत्री जन विकास कार्यक्रमांतर्गत राज्यातील मान्यताप्राप्त गटातील अल्पसंख्याक बहुल क्षेत्रातील शाळांमध्ये स्मार्ट क्लास प्रकल्प राबविण्यासाठी निधी मागणीच्या प्रस्तावासोबत वरीलप्रमाणे विहित नमुन्यातील निधीच्या विनियोगाबाबतची उपयोगिता प्रमाणपत्रे तसेच त्रैमासिक अहवाल (QPR) (अद्ययावत छायाचित्रासह) शासनास सादर करावीत.

६. उपरोक्त प्रमाणे सन २०२१-२२ या वर्षात प्रधानमंत्री जन विकास कार्यक्रमांतर्गत राज्यातील मान्यताप्राप्त अल्पसंख्याक बहुल क्षेत्रातील शाळांमध्ये स्मार्टक्लास प्रकल्प राबविण्यासाठी केंद्र हिश्श्यातील रू.२,२५,५५,२००/- (अक्षरी रू.दोन कोटी पंचवीस लाख पंचावन्न हजार दोनशे फक्त) तसेच त्याससमरुप वितरीत करावयाचा राज्य हिश्श्यातील रु.१,५०,३६,८००/- (अक्षरी रू.एक कोटी पंन्नास लाख छत्तीस हजार आठशे फक्त) अशी केंद्र व राज्य हिश्श्यातील एकूण रू.३,७५,९२,०००/- (अक्षरी रू.तीन कोटी पंच्याहत्तर लाख ब्याण्णव हजार फक्त) इतकी रक्कम अवर सचिव (१), अल्पसंख्याक विकास विभाग, मंत्रालय, मुंबई यांना सुपूर्द करण्यात येत असून याकरिता ते आहरण व संवितरण अधिकारी म्हणून व उपसचिव (अर्थसंकल्प), अल्पसंख्याक विकास विभाग हे नियंत्रक अधिकारी म्हणून काम पाहतील. सदर रकमेचा ईसीएस (ECS) अवर सचिव (१), अल्पसंख्याक विकास विभाग, मंत्रालय, मुबई यांच्या नावाने काढण्यात यावा.

७. सदर योजनेंतर्गत केंद्र हिश्श्यावर होणारा खर्च "मागणी क्र.झेड ई-१, मुख्यलेखाशीर्ष २२३५, सामाजिक सुरक्षा व कल्याण, ०२ समाजकल्याण, २०० इतर कार्यक्रम, केंद्र पुरस्कृत योजना (००) (१७) अल्पसंख्याक बहुल क्षेत्रासाठी बहुक्षेत्रीय विकास योजना, (केंद्र हिस्सा) (कार्यक्रम) (२२३५- ए ५४३) ३१ सहायक अनुदान (वेतनेतर)" या लेखाशीर्षाखाली व राज्य हिश्श्यावर होणारा खर्च "मागणी क्र.झेड ई-१, मुख्यलेखाशीर्ष २२३५, सामाजिक सुरक्षा व कल्याण, ०२ समाजकल्याण, २०० इतर कार्यक्रम, केंद्र पुरस्कृत योजना (०१) (१४) अल्पसंख्याक बहुल क्षेत्रासाठी बहुक्षेत्रीय विकास योजना, ( राज्य हिस्सा) (कार्यक्रम) (२२३५-ए २३१ ) ३१ सहायक अनुदान (वेतनेतर)" या लेखाशिर्षाखाली सन २०२१-२२ या आर्थिक वर्षात उपलब्ध मंजूर अनुदानातून भागविण्यात यावा.

८. हा शासन निर्णय वित्त विभाग, शासन परिपत्रक क्र.अर्थसं-२०२१/प्र.क्र.४८/अर्थ-३, दि.२४/०६/२०२१ अन्वये तसेच प्रधान सचिव कार्यालय, वित्त विभाग यांच्या अनौ.संदर्भ क्र.३४१८/२०२१/व्यय-१, दि.२०/८/२०२१ अन्वये प्रशासनिक विभागास प्रदान करण्यात आलेल्या अधिकांरानुसार निर्गमित करण्यात येत आहे.

९. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.inया संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संगणक संकेताक २०२११०२८१४५५१४९५१४ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

DINESH MADHAVRAO SONAVANE

Digitally signed by DINESH MADHAVRAO SONAVANE
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=MINORITY DEVELOPMENT DEPARTMENT, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=9cabb099fd0576208f4caa310d2e7860201ab5363a2133e0927ff26c0f016fdf, pseudonym=1F9A10571D88646ED6CD168DADBFEDACC3DD2F35, serialNumber=6ADB2BDBBD3BD651A8ADE806B6E4AEA66DAA5512EA788889AF1515751ABC0181, cn=DINESH MADHAVRAO SONAVANE
Date: 2021.11.01 15:25:57 +05'30'

**(दि.मा.सोनवणे)**
**उप सचिव,महाराष्ट्र शासन**

**प्रत:-**

१. अपर मुख्य सचिव, शालेय शिक्षण व क्रिडा विभाग,मंत्रालय,मुंबई.
२. मा.मंत्री/राज्यमंत्री (अविवि) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय,मुंबई.
३. संचालक, टेलिकम्युनिकेशन कन्सल्टंट इंडिया लिमिटेड (TCIL),नवी दिल्ली.
४. सह सचिव (विद्यार्थी विकास) शालेय शिक्षण व क्रिडा विभाग,मंत्रालय,मुंबई.
५. सह संचालक,(प्राथमिक शिक्षण ) शिक्षण संचालनालय,पुणे.
६. अवर सचिव, रोख शाखा, अल्पसंख्याक विकास विभाग,मंत्रालय,मुंबई.
७. वित्त विभाग (अर्थसंकल्प -४/ व्यय -४) मंत्रालय,मुंबई.
८. नियोजन विभाग (कार्या.१४७५) मंत्रालय,मुंबई.
९. महालेखापाल, महाराष्ट्र -१/२ (लेखा व अनुज्ञेयता) मुंबई/नागपूर.
१०. महालेखापाल, महाराष्ट्र -१/२ (लेखा व परीक्षा) मुंबई/नागपूर.
११. सहसंचालक, लेखा व कोषागारे,संगणक कक्ष,नविन प्रशासकीय भवन,५ वा मजला,मुंबई.
१२. जिल्हा कोषागार अधिकारी,जिल्हा बुलडाणा.
१३. निवडनस्ती,(का.७)